**कुर्ला पोलीस स्टेशन येथील गु.र.नं. २३/२०१० या गुन्ह्याप्रकरणी मा.सत्र न्यायालय,मुंबई येथे न्यायालयीन कामकाज पाहण्याकरीता विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड.श्री.वैभव बगाडे यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी ०२१२/प्र.क्र.१४९/पोल-१०**
२ रा मजला, मंत्रालय, हुतात्मा राजुगुरु चौक
मादाम कामा रोड, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३० जून, २०१८

**संदर्भ:- शासन अधिसुचना, विधी व न्याय विभाग क्र.एसपीपी २०१२/यु.ओ.आर.११६/डी-१४, दिनांक ०२.०४.२०१८.**

**शासन निर्णय:-**

कुर्ला पोलीस स्टेशन येथील गु.र.नं. २३/२०१० या गुन्ह्याप्रकरणी मा.सत्र न्यायालय,मुंबई येथे न्यायालयीन कामकाज पाहण्याकरीता ॲड.श्री.वैभव बगाडे यांची विधी व न्याय विभागाच्या वरील संदर्भाधीन दि.०२.०४.२०१८ च्या अधीसूचनेद्वारे विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. सबब,प्रस्तुत प्रकरणी ॲड.श्री.वैभव बगाडे यांना प्रतिदिन खालीलप्रमाणे फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

अ) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी रु.१०,०००/-
ब) प्रत्यक्षात केलेला प्रवास व निवास खर्च

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिका-याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी. तसेच, प्रस्तुत प्रकरणी ॲड.श्री.वैभव बगाडे यांना उपरोक्त फी व्यतिरिक्त अपरिणामकारक सुनावणी फी किंवा अन्य कोणत्याही प्रकारची फी वा भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र.बी-१, २०५५ पोलीस - (००)(१०८), राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१), शहर पोलीस आस्थापना (२०५५ ००९७) - २८ व्यावसायिक सेवा, या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात येईल.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१७१/१८/व्यय-७, दिनांक ०१.०६.२०१८ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७०२१०४९०३३९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ce6f6edd7e1dfc6b4d6b65b7d93aa1a1dbcf0ec79c7c2143850ff6e8fdcb4c0d, serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2018.07.02 10:50:38 +05'30'

**(किशोर शामराव भालेराव)**
उप सचिव (विधी),गृह विभाग,
महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
२. सह पोलीस आयुक्त (गुन्हे),बृहन्मुंबई.
३. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य, मुंबई .
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखापरीक्षा अधिकारी,मुंबई.
६. ॲड.श्री.वैभव बगाडे, बी-३०५, समजदीप को.ऑप.हौ.सो.,अदुकीया रोड, एस.व्ही.रोड, कांदिवली (प), मुंबई-४०० ०६७
७. विधी व न्याय विभाग (का-१४), मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती (पोल-१०).